सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी पंचायत
समित्यांच्या प्रशासकीय इमारतीच्या बांधकामासाठी
<u>सहाय्यक अनुदान वितरण आदेश .</u>
लेखाशिर्ष-२५१५ ००५३ (योजनांतर्गत)

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः योजना-२०१८/प्र.क्र. ९२/बांधकाम-४
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीख: १६ ऑगस्ट, २०१८

<u>वाचा :-</u>

१) शासन परिपत्रक क्रमांकः वि.वि.अर्थसं २०१८/ प्र.क्र.६९/ अर्थसंकल्प-३, दि.०२.०४.२०१८

२) शासन निर्णय क्र. पंसई-२०१८/प्र.क्र. ११३/बांधकाम-४,दि.२९.०६.२०१८

शासन निर्णय :-

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता संपूर्ण अर्थसंकल्पास मंजूरी मिळाली असून जिल्हा परिषदा व पंचायत समित्यांच्या प्रशासकीय इमारतींच्या बांधकामासाठी एकूण ८०००.०० लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्पित झालेली असून, मंजूर तरतूदीच्या ७० टक्के मर्यादेत या लेखाशिर्षांतर्गत खर्च भागविण्याकरीता वित्त विभागाने रू ५६००.००लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिली आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भीय दिनांक ०२.४.२०१८ च्या परिपत्रकात नमुद केल्यानुसार प्रशासकीय विभागांना दिलेल्या निधी वितरणाच्या अधिकाराच्या विहित मर्यादेच्या अधीन राहून, जिल्हा परिषद, बीड प्रशासकीय इमारतीच्या बांधकामांसाठी एकूण रक्कम रु. ७,६४,८८,०००/- (अक्षरी रु. सात कोटी चौसष्ठ लक्ष अठ्याऐंशी हजार फक्त) इतके सहायक अनुदान माहे जुलै ,२०१८ च्या कॅश-फ्लो मध्ये मंजूर करुन, संदर्भीय दि. २९.०६.२०१८ च्या शासन निर्णयान्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद बीड यांना वितरीत करण्यात आले आहे.

३. वित्त विभागाच्या संदर्भीय दिनांक ०२.४.२०१८ च्या परिपत्रकात नमुद केल्यानुसार प्रशासकीय विभागांना दिलेल्या निधी वितरणाच्या अधिकाराच्या विहित मर्यादेच्या अधीन राहून, पंचायत समिती इमारतींच्या बांधकामासाठी एकूण रक्कम रु. ४९७.५२ लक्ष (अक्षरी रु. चार कोटी सत्त्याण्णऊ लक्ष बावन्न हजार फक्त) इतके सहायक अनुदान माहे ऑगस्ट,२०१८ च्या कॅश-फ्लो मध्ये मंजूर करुन, मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद, चंद्रपूर यांच्या अधिनस्त ठेवण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

-: निधी वितरणाचे विवरणपत्र :-

| लेखाशिर्ष-२५१५ ००५३ खाली (प्रशासकीय इमारत बांधकामासाठी) वितरीत करण्यात आलेला निधी | | |
|---|---|---|
| अ.क्र. | पंचायत समितीचे नाव | वितरीत करण्यात आलेला निधी (रु. लक्ष मध्ये) |
| १ | २ | ३ |
| १ | पं.स.पोंभुर्णा (चंद्रपूर )प्रशाई फर्निचर | ९७.५२ |
| २ | पं.स.मुल ((चंद्रपूर )प्रशाई | ४००.०० |
| | एकूण | ४९७.५२ |

४. वरील विवरणपत्रातील कामांकरीता होणारा खर्च मागणी क्र. एल-३ " २५१५, इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १०१-पंचायत राज, ३१-सहायक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारत बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३) (योजनांतर्गत) " या लेखाशिर्षा खाली सन २०१८-१९ साठी करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. वरील विवरणपत्रामध्ये ज्या कामाच्या प्रयोजनार्थ निधी उपलब्ध करुन दिलेला आहे, तो त्याच कामावर तात्काळ खर्च करुन, सदर सहाय्यक अनुदानाच्या विनियोजना संबंधीचे उपयोगिता प्रमाणपत्रे, महालेखापाल, संबंधीत विभागीय आयुक्त यांना पाठवून, त्याची प्रत या विभागाकडे आठ दिवसांत पाठविण्याची जबाबदारी संबधित मुख्य वित्त व लेखाअधिकारी, जिल्हा परिषद यांची राहील. तसेच सदर अनुदानाच्या विनियोजना संबधी महालेखापाल कार्यालयास पाठविण्यात आलेल्या उपयोगिता प्रमाणपत्राची प्रत शासनास मुदतीत पाठविण्यात न आल्यास व सदरहु बांधकामाबाबतची माहिती इमारत बांधकामाकरीता विकसीत करण्यात

आलेल्या कंस्ट्रक्शन ट्रॅकर या प्रणालीवर न भरल्यास संबधित जिल्हा परिषदेच्या कामावर पुढील सहायक अनुदान वितरीत केले जाणार नाही, याची कृपया नोंद घेण्यात यावी.

६. प्रस्तुतचा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं -२०१८/प्र.क्र.६९ / अर्थसंकल्प -३, दि. ०२.०४.२०१८ मधील अटी-शर्तीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१८०८१६१७२२५८०८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

R A Nagargoje

Digitally signed by R A Nagargoje
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=decff3a81eacee2237c8c2d29460e7c459d9f7baaab677f7578d952747d49ab2, cn=R A Nagargoje
Date: 2018.08.16 17:45:02 +05'30'

( र.आ. नागरगोजे )

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.विरोधी पक्ष नेता विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
२) विभागीय आयुक्त औरंगाबाद.
३) महालेखापाल लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा महाराष्ट्र-१ मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर
५) कार्यकारी अभियंता (बांधकाम) जि.प. परिषद, चंद्रपूर
६) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर
७) जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर
८) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
९) उपमुख्यलेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा,जिल्हा परिषद, चंद्रपूर
१०) वित्त विभाग, (व्यय १५/ अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११) नियोजन विभाग (का.क्र.१४४३) मंत्रालय, मुंबइ ४०० ०३२
१२) कार्यासन, वित्त-१, वित्त-७ ग्राम विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
१३) निवड नस्ती कार्यासन क्रमांक बांधकाम-४, ग्राम विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२